राज्य मंडळाच्या सर्व  शाळांमध्ये “आनंददायी शनिवार” हा उपक्रम राबविणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१२६/एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :-१४ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:-**

तर्कसंगत विचार आणि कार्य करण्यासाठी सक्षम असणाऱ्या तसेच करुणा, सहानुभूती, साहस, लवचिकता, वैज्ञानिक चिंतन, रचनात्मक कल्पनाशक्ती, नैतिक मूल्य असणाऱ्या उत्तम मनुष्यत्वाचा विकास हा नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाचा महत्त्वाचा उद्देश आहे. सध्याच्या काळात लहान वयातही विद्यार्थ्यांना ताण तणाव, उदासीनता, नैराश्य या मानसिक विकारांना सामोरे जावे लागत आहे.

या सर्व पार्श्वभूमीवर शालेय जीवनात आनंददायी कृती असण्याची गरज प्रकर्षाने जाणवते. यानुषंगाने **“आनंददायी शनिवार” हा उपक्रम राज्य मंडळाच्या सर्व शाळामध्ये** इयत्ता १ ली ते ८ वी या इयत्तांसाठी राबविल्यास विद्यार्थ्यांची शिक्षणाची अभिरुची वाढीस लागेल, त्याचा निश्चितच विद्यार्थ्यांच्या गुणवत्तेवर चांगला परिणाम होईल.तसेच विद्यार्थ्यांच्या  गळती व अनुत्तीर्ण होण्याचे प्रमाण कमी होईल, विद्यार्थ्यांचे मानसिक स्वास्थ्य जपले जाऊन त्यांचें उत्तम अध्ययन व्हावे या हेतूने राज्य मंडळाच्या सर्व शाळांमध्ये इयत्ता पहिली ते आठवीच्या विद्यार्थ्यांसाठी **“आनंददायी शनिवार”** हा उपक्रम  राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

विद्यार्थ्यांना त्यांच्या वर्तन व जबाबदारी बाबत जागरूकता निर्माण व्हावी, विद्यार्थ्यांमध्ये चांगल्या सवयी ,सहकार्य वृत्ती, नेतृत्व गुणांचा विकास व्हावा, या हेतूने राज्य मंडळाच्या सर्व  शाळांमध्ये येत्या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १ ली ते इयत्ता ८ वी च्या विद्यार्थ्यांसाठी आठवड्यातील प्रत्येक शनिवार हा आनंददायी शनिवार हा उपक्रम राबविण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**२.  सदर उपक्रमाचा उद्देश खालीलप्रमाणे आहे.**

१. विद्यार्थ्यांचे मानसिक स्वास्थ्य उत्तम राखणे.
२. विद्यार्थ्यांमध्ये सामाजिक, भावनिक कौशल्ये विकसित करणे
३. शालेय स्तरावर ताणतणावाचे व्यवस्थापन करण्यासाठी विद्यार्थ्यांना सक्षम बनविणे
४. विद्यार्थ्यांमध्ये संभाषण कौशल्य विकसित करणे.
५. विद्यार्थ्यांमध्ये आत्मविश्वास व नैराश्येवरमात करण्याची क्षमता निर्माण करणे.

६. विद्यार्थ्यांची शिकण्याची तयारी खेळीमेळीच्या वातावरणातून करणे

३. **आनंददायी शनिवार या उपक्रमामध्ये खालील कृतींचा समावेश असेल.**

१. प्राणायाम/ योग/ ध्यान-धारणा/ श्वसनाची तंत्रे

२. आपत्ती व्यवस्थापनातची मुलतत्वे व व्यावहारिक प्रशिक्षण

३. दैनंदीन जीवनातील वित्तीय व्यवस्थापन

४. स्वत:च्या आरोग्याची रक्षण करण्यासाठी उपाययोजना

५. रस्ते सुरक्षा

६. समस्या निराकरणाची तंत्रे

७. कृती, खेळ यावर आधारित उपक्रम

८. Mindfulness वर आधारित कृती व उपक्रम

९. नातेसंबंध हाताळण्याचे कौशल्य

वरील कृतींसोबत इतर तत्सम प्रकारच्या नाविन्यपुर्ण कृतींचा समावेश करण्याची मुभा शाळांना राहील.

४. आनंददायी शनिवार हा उपक्रम राबवत असतांना प्रत्येक शनिवारी प्रचलित वर्गाऐवजी विद्यार्थ्यांचा शनिवार हा वरील कार्यपध्दतीनदवारे आंनददायी स्वरुपाचा होण्याच्या दृष्टिने आयुक्त (शिक्षण), पुणे व संचालक, राज्य शैक्षणिक व संशोधन परिषद यांनी एकत्रितपणे रुपरेषा तयार करून त्याची अंमलबजावणी करण्याबाबत कार्यवाही करावी.

**५.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०३१४२०५००३९६२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.14 21:02:53 +05'30'

**( तुषार महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

५. मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र, मुंबई,

६. मा. सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र, मुंबई,

७. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी, मंत्रालय, मुंबई-३२.

८. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र, पुणे

१०.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई

११.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे

१२.शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१४.निवड नस्ती.